**सातारा जिल्हा कारागृह येथील कारागृहाच्या पूर्व व दक्षिण बाजूस काटेरी तारेचे कुंपण घालण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**

शासन निर्णय क्रमांक- कांकका)-२००२/४३२/प्र.क्र.६८//पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक :- २३ डिसेंबर,२००२.

पहा:- १) कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे यांचे पत्र क्रमांक- बीएलडी/१०७/३२/काम-३,दिनांक २६.४.२००२.
२) वित्त विभाग,शासन निर्णय,क्र.विअप्र-१०००/प्र.क्र.४६/२००१/ विनियम, दिनांक ११.७.२००१.

**शासन निर्णय:-** सातारा जिल्हा कारागृह येथील कारागृहाच्या पूर्व व दक्षिण बाजूस काटेरी तारेचे कुंपण घालण्यासाठी येणारा खर्च रु. ३,६३,३५१/- च्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास प्रशासकीय मान्यता मंजूर करावी अशी कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी शासनास विनंती केली आहे. प्रस्तावाचे खर्चाचे अंदाजपत्रक व बांधकामाचा नकाशा हा कार्यकारी अभियंता व उपअभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग सातारा यांनी मंजूर केला असून त्यास शासनाने प्रशासकीय मान्यता दयावी अशी शासनास विनंती केली आहे.

२. सातारा जिल्हा कारागृह येथील कारागृहाच्या पूर्व व दक्षिण बाजूस काटेरी तारेचे कुंपण घालण्याच्या आवश्यकतेबाबत कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य पुणे यांनी असे नमूद केले आहे की, कारागृहाच्या पूर्व व दक्षिण बाजूच्या तटावरून बाहेरील बाजूने कारागृहात अवैध वस्तू फेकण्याच्या घटना वारंवार होत आहेत. त्यामुळे कारागृहाच्या सुरक्षा व्यवस्थेला धोका निर्माण होण्याची शक्यता आहे. यावर प्रतिबंध करण्यासाठी काटेरी तारेचे कुंपण घालणे अत्यंत आवश्यक आहे.

३. सातारा जिल्हा कारागृह येथील कारागृहाच्या पूर्व व दक्षिण बाजूस काटेरी तारेचे कुंपण घालण्यासाठी येणारा खर्च रु. ३,६३,३५१/- हा वित्तिय अधिकाराच्या मर्यादेत आहे. त्यामुळे यास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उप विभाग पाच महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका अंतर्गत विवरणपत्रातील अ.क्र.१, परिच्छेद क्र.१३४, रकाना क्र. ५ व ६ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून तसेच वित्त विभाग,शासन निर्णय क्रमांक- .विअप्र- १०००/ प्र.क्र.४६/२००१/विनियम दिनांक ११.७.२००१ अन्वये मंत्रालयीन प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन सातारा जिल्हा कारागृह येथील कारागृहाच्या पूर्व व दक्षिण बाजूस काटेरी तारेचे कुंपण घालण्यास येणारा खर्च रु. ३,६३,३५१/- (रु.तीन लक्ष

/SM

त्रेसष्ट हजार तीनशे एकावन्न फक्त ) इतक्या खर्चाच्या अंदाजपत्रकास व बांधकामाच्या नकाशास खालील अटींच्या अधीन राहून शासन या आदेशाद्वारे प्रशासकीय मान्यता देत आहे.

१) प्रस्तावित कामाच्या खर्चाची तरतूद अर्थसंकल्पात झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये.

२) यापूर्वी प्रशासकीय मान्यता दिलेली कामे प्रथम पूर्ण करण्यात यावीत व नंतरच या कामास सुरुवात करावी.

३) प्रस्तुतचे काम मंजूर अनुदानातूनच पूर्ण करण्यात यावे. यास अतिरिक्त अनुदान मंजूर करण्यांत येणार नाही.

४. यासाठी होणारा खर्च "मुख्य लेखाशिर्ष ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१ बांधकाम,पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (तुरुंग)" प्रमुख बांधकामे (००)(१०) तुरुंग (४०५९०११७) मागणी क्रमांक-एच-८ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा.

५. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८६/का.१४११, दिनांक ४.१०.२००२ च्या मान्यतेने व वित्त विभागाच्या दिनांक ११.७.२००१ च्या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या वित्तिय अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यांत येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(र. ना. माळी)

कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

प्रति,

कारागृह महानिरीक्षक ,महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) , महाराष्ट्र राज्य,पुणे.

कारागृह उपमहानिरीक्षक,पश्चिम विभाग, येरवडा, पुणे.

अधिक्षक,सातारा जिल्हा कारागृह,

महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)((लेखा परीक्षा ) मुंबई.

महालेखापाल ,महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परिक्षा)नागपूर

जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा.

वित्त विभाग(व्यय-८) मंत्रालय,मुंबई.

नियोजन विभाग(कार्यासन-१४११)मंत्रालय,मुंबई

सार्वजनिक बांधकाम विभाग(इमा-२)मंत्रालय,मुंबई

कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग,मंडळ, सातारा.

अवर सचिव,गृह विभाग,बीयुडी-१,मंत्रालय,मुंबई

निवडनस्ती- पीआरएस-२.